महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मधील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मध्ये देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती रद्द करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मविसे-१०१४/प्र.क्र.३३५(भाग-३)/२०१४/आस्था-३**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, मुंबई- ४०० ००१.
तारीख : ०४ ऑगस्ट, २०१५.

**संदर्भ-**

१) शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. मविसे-१०१४/प्र.क्र.३३५/२०१४/आस्था-३, दिनांक १८.४.२०१५.
२) श्री.पी.एन.गिते, बाल विकास प्रकल्प अधिकारी, राळेगांव, जि.यवतमाळ यांचा दिनांक ४.५.२०१५ चा विनंती अर्ज.

**शासन आदेश :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ मध्ये नमूद दिनांक १८.४.२०१५ च्या आदेशातील अ.क्र.११ नुसार महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मधील श्री.पी.एन.गिते, बाल विकास प्रकल्प अधिकारी, राळेगांव, जि.यवतमाळ यांची महाराष्ट्र विकास सेवा गट-अ या संवर्गात पीबी-३ वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेडवेतन ५४०० या वेतनश्रेणीत गट विकास अधिकारी, पंचायत समिती खामगांव, जि.बुलडाणा या रिक्त पदावर तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना करण्यात आली होती.

२. तथापि, श्री.पी.एन. गिते यांनी संदर्भाधीन क्र.२ मध्ये नमूद विनंती अर्जान्वये तदर्थ पदोन्नती नाकारली असल्यामुळे श्री.पी.एन.गिते, बाल विकास प्रकल्प अधिकारी, राळेगांव, जि.यवतमाळ यांची संदर्भाधीन क्र.१ मध्ये नमूद दिनांक १८.४.२०१५ च्या आदेशान्वये महाराष्ट्र विकास सेवा गट-अ या संवर्गात पीबी-३ वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेडवेतन ५४०० या वेतनश्रेणीत गट विकास अधिकारी, पंचायत समिती खामगांव, जि.बुलडाणा या रिक्त पदावर दिलेली तदर्थ पदोन्नती या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे. सदर तदर्थ पदोन्नती रद्द केल्याच्या परिणामी श्री.पी.एन. गिते हे महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये बाल विकास प्रकल्प अधिकारी, राळेगांव, जि.यवतमाळ या पदावर पूर्ववत कार्यरत राहतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८०४१२२८१५९५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 917064, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHINDE VIJAY DATTATRAYA
Date: 2015.08.04 14:35:17 +05'30'

( वि.द. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२. सर्व विभागीय आयुक्त.
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
४. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद.
५. संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजन संचालनालय, नवी मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
७. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
८. मा. राज्यमंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
९. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक
१०. श्री.पी.एन.गिते, बाल विकास प्रकल्प अधिकारी, राळेगांव, जि.यवतमाळ (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांच्यामार्फत)
११. सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२ / कार्यासन-१६ब), मंत्रालय, मुंबई
१२. कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. कार्यासन, आस्था-३अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांना कळविण्यात येते की, बाल विकास प्रकल्प अधिकारी ही पदे महिला व बाल विकास विभागाकडे वर्ग करण्यात येत असल्याने श्री.पी.एन. गिते यांच्या सेवा बाल विकास प्रकल्प अधिकारी पदावरुन वर्ग करुन त्यांना ग्राम विकास विभागाअंतर्गत सहायक गट विकास अधिकारी पदावर पदस्थापना देण्याची कार्यवाही करावी.
१४. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग